मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी दिनांक २३.१२.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणेबाबत.
श्री. विश्वनाथ आत्माराम किरसान

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एस-३०/२०१६/प्र.क्र. २२२/फ-९**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ डिसेंबर, २०१६

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-७(२)/आस्था-३/वम/प्र.क्र.१२१(२)(०४-०५)/६/१६-१७, दिनांक ०७.०४.२०१६

**प्रस्तावना** :-

गोंदिया वन विभागातील रोजंदारी मजूर श्री. विश्वनाथ आत्माराम किरसान यांना देवरी वन क्षेत्रात माहे आक्टोबर-१९८४ पासून रोजंदारीचे अस्थायी कामावर घेण्यात आले होते. दिनांक ०१.१०.१९८७ रोजी त्यांना कामावरुन बंद करण्यात आल्यामुळे त्यांनी कामगार न्यायालय, भंडारा येथे तक्रार दाखल केली होती. सदर तक्रार यु.एल.पी. क्र. ११२/१९८७ मध्ये दिनांक २५.०२.१९९१ रोजी असा निर्णय दिला की, तक्रारदारास सेवेत घेण्यात येऊन त्यांना मागील सेवा जोडून द्यावी व ५०% थकबाकी द्यावी. सदर निर्णयाविरूध्द रिव्हीजन अपील दाखल करण्यात आले ते कामगार न्यायालय, भंडारा येथे परत पाठविण्यात आले. कामगार न्यायालय, भंडारा यांनी दिनांक २२.०६.२००४ रोजी तक्रार अर्ज फेटाळला. त्या निर्णयाविरुध्द तक्रारदारांनी रिव्हीजन अपील दाखल केले. त्यामध्ये दिनांक १६.०४.२००५ रोजी तक्रारदाराच्या बाजूने निर्णय दिला. त्यावर विभागामार्फत मा. उच्च न्यायालयात रिट याचिका दाखल करण्यात आली. त्यामध्ये दिनांक १७.०२.२०१२ रोजी असा निर्णय दिला की, तक्रारदारास पुर्नस्थापित करण्यात यावे परंतु मागील थकबाकी देण्यात येवू नये. सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी तक्रारदारांनी मा. उच्च न्यायालय, नागपूर येथे अवमान याचिका क्रमांक २३१/२०१४ दाखल केली. या अवमान याचिकेत मा. उच्च न्यायालय, नागपूर यांनी दिनांक २३.१२.२०१४ रोजी निर्णय दिला. या निर्णयाची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

गोंदिया वन विभागातील रोजंदारी मजूर श्री. विश्वनाथ आत्माराम किरसान यांना दिनांक १७.०२.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयानुसार दिनांक ०१.११.१९९४ पासून सेवेत घेण्याकरीता दिनांक ०१.११.१९९४ पासून वनमजूराचे एक अधिसंख्य पद पूर्वलक्षी प्रभावाने निर्माण करून त्यांना दिनांक २४.१२.२०१४ ते दिनांक ३१.०८.२०१५ पर्यंत देय होणा-या फरकाची रक्कम रु. १,२०,५५७/- (अक्षरी रूपये एक लाख वीस हजार पाचशे सत्तावन्न फक्त) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू तक्रारदाराला अदा करावयाची रक्कम अचूक असल्याची खातरजमा मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांनी करावी.

सदरहू खर्च मागणी क्रमांक सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) ०१ वनीकरण ११० वन्यजीव ११० (एक) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६) या लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १६३/२०१६/व्यय-१०, दिनांक २६.०९.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२९१६१०२२८७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2016.12.29 16:13:38 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर.
५. उप वनसंरक्षक, गोंदिया.
६. कार्यासन अधिकारी, व्यय- १०/अर्थ-६, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन अधिकारी, सा.प्र.वि./१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल-I (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.फ-९ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ ( निवड नस्ती).